महाराष्ट्र शासन

**क्रमांक: संकिर्ण-२०१९/प्र.क्र.१५०/१३ अे,**
**कृषि व पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, हुतात्मा राजगुरु चौक,**
मादाम कामा रोड, मंत्रालय-विस्तार,मुंबई-३२
दिनांक: १६ मार्च, २०२०

**विषय**: - कालबाह्य झालेले किरकोळ खर्च व सामुग्री पुरवठा देयके मंजूर करण्याबाबत...

**संदर्भ:**- १. कृषि आयुक्त यांचे क्र.कृषि-१६ (र)/आक्षेप/लेखापूर्वमंजूरी/३२०४/२०१९,दिनांक ९.१०.२०१९ पत्र.
२. कृषि आयुक्त यांचे क्र.कृषि-१६ (र)/आक्षेप/लेखापूर्वमंजूरी/७६४९/२०१९,दिनांक ३.१२.२०१९ पत्र.

**ज्ञापन:**-

उपविभागीय कृषि अधिकारी, बारामती या कार्यालयाच्या सन २०१६-१७ या वर्षातील मजूरीसाठी पुरेसे अनुदान उपलब्ध नसल्याने सदर कालावधीची मजूरीची देयके अदा करता आलेली नाहीत, परिणामी बीले थकित होती. त्याबाबतच्या कालबाह्य झालेल्या देयकास शासन स्तरावरुन मंजूरी देण्याची विनंती करण्यात आली होती. सन २०१९-२० मध्ये प्रलंबित व नियमित चालू आर्थिक वर्षामधील मजूरीची रक्कम अदा करण्यासाठी अनुदान उपलब्ध असल्याने प्रलंबित असलेली मजूरीची रक्कम अदा करणे शक्य आहे.

२. लेखाशिर्ष-१०३ बी बीयाणे (००)(०१) तालुका बीज गुणन प्रक्षेत्रे (२४०१ ०२६१) (अनिवार्य) या योजनेंतर्गत अनुदान वाटप ०२ मजूरी या गौणशीर्षाखाली उपविभागीय कृषि अधिकारी, बारामती या कार्यालयाच्या अधिनस्त असलेल्या तालुका बीज गुणन केंद्रांना खालीलप्रमाणे मजूरीसाठी रक्कम अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रुपयांत)

| अ.क्र. | प्रक्षेत्र | कालावधी | मजूरी रक्कम |
|---|---|---|---|
| १ | तालुका बीज गुणन केंद्र, जाधववाडी | दि.१.११.२०१६ ते ३१.३.२०१७ | २,०७,१९० |
| २ | तालुका बीज गुणन प्रक्षेत्र, दौड | दि.२२.१०.२०१६ ते २९.३.२०१७ | ३,१३,९४४ |
| ३ | तालुका बीज गुणन प्रक्षेत्र, इंदापूर | दि.१.११.२०१६ ते ३१.३.२०१७ | ३,३०,५३० |
| | **एकूण रक्कम** | **सन २०१६-१७** | **८,५१,६६४** |

३. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला उपविभाग एक, अ.क्र.६ नियम ४० नुसार असलेल्या अधिकाराचा वापर करुन उपविभागीय कृषि अधिकारी, बारामती अधिनस्त तालुका बीज

गुणन केंद्र, इंदापूर, दौंड व जाधववाडी या कार्यालयांची सन २०१६-१७ या कालावधीमध्ये कालबाह्य झालेली रु.८,५१,६६४/- (रु.आठ लाख, एकावन्न हजार, सहाशे चौसष्ट फक्त) ची प्रलंबित देयके -१०३ बी बीयाणे (००)(०१)तालुका बीज गुणन प्रक्षेत्रे (२४०१ ०२६१) (अनिवार्य) या योजनेंतर्गत अनुदान वाटप ०२ मजूरी या गौणशीर्षाखाली सन २०१९-२० च्या उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००३१६१०४८००७९०१ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.03.16 10:58:13 +05'30'

**( अशोक आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे
२. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. विभागीय कृषि सहसंचालक, पुणे विभाग, पुणे-५
४. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा) मुंबई, नागपूर
५. महालोखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई, नागपूर
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
७. सहसंचालक,लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नविन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई-३२
८. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, पुणे
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०.उपविभागीय कृषि अधिकारी, बारामती
११.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२.निवडनस्ती (१३ अे)